<u>स्वेच्छा सेवानिवृत्ती बाबत</u>
**डॉ. सुनिल सुरेश कुलकर्णी,**
**वैद्यकीय अधिकारी, गट-अ**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
शासन निर्णय क्रमांकः **न्यायिक-२०१४/प्र.क्र.३९३/सेवा-३**
गोकुळदास तेजपाल रुग्णालय आवार, संकुल इमारत, १० वा. मजला
मंत्रालय, मुंबई-४०० ००१
तारीख: ०८ ऑगस्ट, २०१७

**वाचा :-** १) संचालक, आरोग्य सेवा, मुंबई यांचे पत्र क्र. संआसे/२ब/टे-४/स्वेसेनि-के-४/२ ब/१०४४/१५, दि. ०५.०६.२०१५
२) सह संचालक, आरोग्य सेवा (अ. व प्र.) मुंबई यांचे पत्र क्र. संआसे/२ब/टे३/न्यप्र ७०/डॉ. कुलकर्णी/७१५/१६, दि. २७.४.२०१६
३) मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण मुंबई खंडपीठ औरंगाबाद यांचे आदेश दि. १५.०४.२०१५.
४) मा. उच्च न्यायालय, मुंबई खंडपीठ औरंगाबाद यांचे आदेश दि. २१.१.२०१६
५) सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन निर्णय समक्रमांक दि.२८.०६.२०१६.
६) सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन निर्णय क्र.विभाचौ-१११९/प्र.क्र.७२/(१९१/१४)/सेवा-४, दि.२५.०७.२०१७.

**प्रस्तावना :-**

उपरोक्त संदर्भाधीन अ.क्र. ५ येथील शासन निर्णयान्वये श्री. सुनिल सुरेश कुलकर्णी, वैद्यकीय अधिकारी उप जिल्हा रुग्णालय वैजापूर, जि. औरंगाबाद यांना महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तीवेतन) नियम, १९८२ मधील नियम १३० व विभागीय चौकशी नियम पुस्तिका चौथी आवृत्ती १९९१ मधील नियम ३.२४ च्या अधिन राहून दि. २९.०१.२०१४ (म.नं.) पासून स्वेच्छेने सेवानिवृत्त झाल्याचे घोषित करण्यात आले आहे. तथापि, डॉ. कुलकर्णी यांच्याविरुध्द दि.१४.०१.२०१६ रोजी बजावण्यात आलेल्या दोषारोप उक्त संदर्भाधिन अ.क्र. ६ येथील शासन निर्णयान्वये मागे घेण्यात आले आहेत. त्यामुळे संदर्भाधीन अ.क्र.५ येथील शासन निर्णय अधिक्रमित करुन सुधारीत शासन निर्णय निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

**शासन निर्णय :-**

१. प्रस्तावनेतील उपरोक्त वस्तुस्थिती विचारात घेवून, दि.२८.०६.२०१६ रोजीचे शासन निर्णय अधिक्रमित करुन शासन खालीलप्रमाणे सुधारित शासन निर्णय निर्गमित करीत आहे.

२. महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवा, वैद्यकीय अधिकारी गट या संवर्गातील (वेतनश्रेणी रु. १५६००-३९१००+ ग्रेड पे रु. ५४००) डॉ. सुनिल सुरेश कुलकर्णी, वैद्यकीय अधिकारी, उप जिल्हा रुग्णालय वैजापूर, जि. औरंगाबाद यांनी त्यांच्या दि. ०१.११.२०१३ च्या अर्जान्वये दि. २९.०१.२०१४ (म.नं.) पासून दिलेली स्वेच्छा सेवानिवृत्तीची सूचना स्विकारण्यात आली असून, त्यानुसार डॉ. कुलकर्णी, वैद्यकीय अधिकारी, गट-अ यांना महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधीकरण मुंबई, खंडपीठ औरंगाबाद यांचे मुळ अर्ज क्र.४८७ मधील दि.१५/०४/२०१५ चे आदेश आणि मा. उच्च

न्यायालय, मुंबई, खंडपीठ औरगाबाद यांच्या रिट याचिका क्र.११४८६ मधील दि. २१/०१/२०१६ चे आदेश व महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तीवेतन), नियम, १९८२ मधील नियम क्रमांक ६६ (१) मधील तरतुदीच्या अधीन राहून डॉ. कुलकर्णी, वैद्यकीय अधिकारी, गट-अ दि. २९.०१.२०१४ (म.न.) पासून स्वेच्छेने सेवा निवृत्त झाले आहेत, असे घोषित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक 201708081518239517 असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Satish Hanmantrao Bhosale

Digitally signed by Satish Hanmantrao Bhosale
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Health Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=4c0ff0607bc973d9663171bd9b8a9b9ab8cb569b155f9653d1180a4549819299, cn=Satish Hanmantrao Bhosale
Date: 2017.08.08 15:26:51 +05'30'

**(स. ह. भोसले)**
**अवर सचिव, महाराट्र शासन**

प्रत,

१) संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई
२) उपसंचालक, आरोग्य सेवा, औरंगाबाद मंडळ औरंगाबाद
३) जिल्हा शल्यचिकित्सक, जिल्हा रुग्णालय, औरंगाबाद
४) महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखारीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर
५) जिल्हा कोषागार अधिकारी, औरंगाबाद
६) वैद्यकीय अधिक्षक, उप जिल्हा रुग्णालय वैजापूर जि. औरंगाबाद
७) कक्ष अधिकारी (सेवा-४ अ), सार्वजनिक आरोग्य विभाग
८) डॉ. सुनिल सुरेश कुलकर्णी, वैद्यकीय अधिकारी, गट-अ यांना (उपसंचालक, आरोग्य सेवा, औरंगाबाद मंडळ औरंगाबाद यांचे मार्फत)
९) मुख्य सादरकर्ता अधिकारी, मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधीकरण मुंबई, खंडपीठ औरंगाबाद. यांना मूळ अर्ज क्र.४८७/२०१४ संदर्भातील दि.१५.०४.२०१५ रोजीच्या आदेशा संदर्भात तसेच मूळ अर्ज क्र.४८७/२०१४ च्या अनुषंगाने संकीर्ण अर्ज क्र.१६५/२०१६, अवमान याचिका, स्टॅम्प क्र.६११/२०१६ च्या संदर्भात माहिती व उचित कार्यवाहीस्तव अग्रेषित.
१०) सहायक सरकारी वकील मा. उच्च न्यायालय मुंबई, खंडपीठ औरंगाबाद यांना रिट याचिका क्र.११४८६/२०१५ दि.२१.०१.२०१६ आदेशा संदर्भात अग्रेषित.
११) निवडनस्ती सेवा-३.